आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०२१-२२ करीता बांधकाम सर्वसाधारण एकत्रित निवास व्यवस्था लेखाशीर्ष (४०५९ ०२३३) या अंतर्गत निधी वितरण आदेश..

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०२१/ प्र.क्र.१०७ /कार्यासन.६**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
**दिनांक: १३ ऑक्टोबर,२०२१**

वाचा

१) शासन निर्णय वित्त विभाग,क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३ दि.२४.०६.२०२१

२) आदिवासी विकास विभागाची नस्ती क्र. शाआबा-२०२१ प्र.क्र.५२/का-२ दि.३०.०८.२०२१

**प्रस्तावना -**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०२१-२२ या वर्षाकरीता मागणी क्रमांक टी-६ मुख्य लेखाशिर्ष ४२२५ , अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्याक यांच्या कल्याणावरील भांडवली खर्च, ०२ अनुसूचित जमातीचे कल्याण, ७९६- जनजाती क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना, अंतर्गत (०१) (०१) शासकीय बांधकाम सर्वसाधारण एकत्रित व्यवस्था (टिएसपी) (४०५९ ०२३३), ५३- मोठी बांधकामे या लेखाशीर्षाखाली रु.१०००.०० लाख इतकी तरतुद अर्थसंकल्पीत आहे. सदर तरतुदीमधून चालू आर्थिक वर्षात अर्थसंकल्पीत कामांकरीता निधी उपलब्ध करुन देण्याबाबत संदर्भाधीन क्र.२ येथील नस्तीन्वये वित्त विभागास सादर केलेल्या प्रस्तावावर अर्थसंकल्पीत तरतुदीच्या ३०टक्के मर्यादेत निधी वितरीत करण्यास वित्त विभागाने मान्यता दिली आहे.त्यास अनुसरुन निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

आदिवासी घ्ज्ञटक कार्यक्रमांतर्गत मागणी क्र. टी-६ मधील शासकीय बांधकाम सर्वसाधारण एकत्रित व्यवस्था (टिएसपी) (४०५९ ०२३३), ५३- मोठी बांधकामे या खाली सन २०२१-२२ या वर्षातील अर्थसंकल्पीय तरतुदीच्या ३० टक्के मर्यादेत **रु.१२१.०० लाख (अक्षरी रुपये एक कोटी एकवीस लाख फक्त)** इतका निधी खालीलप्रमाणे नियंत्रक अधिकारी तथा अधिक्षक अभियंता सार्वजनिक बांधकाम (आदिवासी) मंडळ,नागपुर यांना वितरीत व खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

(रु. लाखात)

| अ.क्र | नियंत्रक अधिकारी | कामांची संख्या | सदर शासन निर्णयाद्वारे वितरीत करण्यात येत असलेला निधी |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | अधीक्षक अभियंता सार्वजनिक बांधकाम(आदिवासी) मंडळ , नागपुर. | ४ | **१२१.००** |

२. सदर निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणाली (BEAMS )वर वितरीत करण्यात येत असुन सदर निधी सोबत जोडलेल्या विवरणपत्रात नमुद केल्यानुसार एकूण ०४ **कामांवर** रकाना ६ मध्ये नमुद केलेल्या मर्यादेत खर्च करण्यात यावा.

३. सदर निधीचे वितरण खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून मंजूर करण्यात येत आहे.

१) संबंधित नियंत्रक अधिकारी यांनी अर्थसंकल्पीय प्रकाशन परिशिष्ट -ड मध्ये समाविष्ट असलेल्या कामांवरच खर्च करण्याबाबत तसेच प्रशासकीय मान्यतेच्या/सुधारित प्रशासकीय मर्यादेतच खर्च करण्याबाबत दक्षता घ्यावी.

२) सोबतच्या विवरणपत्रात नमुद केलेल्या **०४** कामांवरच सदरील निधी खर्च होईल याची दक्षता संबंधित नियंत्रक अधिकारी यांनी घ्यावी

३) अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम (आदिवासी) मंडळ, **नागपुर** यांचे मार्फत सदर बांधकामांना वेळोवेळी भेटी देण्यात येवून कामाचा दर्जा, गुणवत्ता यांची तपासणी करावी व वितरीत करण्यात आलेला निधी योग्य रित्या खर्च होत आहे याची दक्षता घ्यावी.

४) अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम (आदिवासी मंडळ) नागपुर यांचे मार्फत प्राप्त मागणीस अनुसरुन निधी वितरीत करण्यात येत असुन सदर निधी दि.३१ मार्च, २०२२ अखेर खर्च होईल याची दक्षता घ्यावी.

५) सदर वितरीत निधीमधुन झालेल्या खर्चाचा अहवाल नियंत्रक अधिकारी यांनी एकत्रित करुन तो विहित प्रपत्रात शासनास सादर करावा.

६) वित्त विभागाच्या वेळोवेळी निर्गमित शासन परिपत्रकामधील विहित केलेल्या अटी व शर्तीचे पालन करण्याची जबाबदारी नियंत्रक अधिकारी यांची राहील.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधीन संदर्भाधीन दिनांक २४.०६.२०२१ च्या शासन निर्णयान्वये प्रदान केलेल्या अधिकारांत व अनौपचारीक संदर्भ क्र.५३५/व्यय-१४ , दि.१७.०८.२०२१ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११०१३११४६०९०३२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ravindra Digambarro Aute

Digitally signed by Ravindra Digambarro Aute
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tribal Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f05a6913f9dee1f453c9a1c5a89d8c4897737ba8e4ac0edf3f2c6e69e25f4108, cn=Ravindra Digambarro Aute
Date: 2021.10.13 16:45:21 +05'30'

**(रविंद्र दि.औटे)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा.मंत्री, आदिवासी विकास, यांचे खाजगी सचिव , मंत्रालय, मुंबई.
२. मा.राज्यमंत्री, आदिवासी विकास,यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. सचिव,आदिवासी विकास विभाग, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
४. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
५. मुख्य अभियंता, बांधकाम व्यवस्थापन कक्ष, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नागपुर/अमरावती
७. प्रकल्प अधिकारी, ए.आ.वि.प्र, नागपुर/चंद्रपुर .
८. अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम (आदिवासी) मंडळ,नागपुर.
९. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम (आदिवासी) विभाग,ठाणे/धुळे/अमरावती/चंद्रपूर.
१०. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
११. अधिदान व लेखाधिकारी,मुंबई.
१२. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१३. जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे/धुळे.
१४. वित्त विभाग (व्यय १४/अर्थ-१९), मंत्रालय, मुंबई-३२
१५. कार्यासन -२, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१६.निवड नस्ती (का-६) आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

| शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०२१/ प्र.क्र.१०७/कार्यासन.६, दि. १३ / १०/२०२१ सोबतचे विवरणपत्र. | | | | |
|---|---|---|---|---|
| | | | | रु. लाखात |
| अ.क्र. | कामाचे नाव | प्रशासकीय मान्यता किंमत | ३१ मार्च २०२१ पर्यंत खर्च | सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येत असलेला निधी |
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| कार्यकारी अभियंता, सार्व.बांधकाम (आदिवासी विभाग) चंद्रपुर | | | | |
| १ | प्रकल्प अधिकारी एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प,चंद्रपूर | ४८९.०० | ११४.६९ | १०० |
| कार्यकारी अभियंता, सार्व.बांधकाम (आदिवासी विभाग) अमरावती | | | | |
| १ | प्रकल्प अधिकारी एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प , किनवट जि.नांदेड | ६९१.५१ | ० | ७ |
| २ | प्रकल्प अधिकारी एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प , कळमनुरी जि. हिंगोली | ६९१.५१ | ० | ७ |
| ३ | प्रकल्प अधिकारी एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प , पांढरकवडा जि. यवतमाळ | ७२९.८१ | ० | ७ |
| | अमरावती विभाग एकुण | २११३ | ० | २१ |
| ४ | अधिक्षक अभियंता, सार्व.बांधकाम (आदिवासी मंडळ)नागपुर एकुण | २६०१.८३ | ११४.६९ | १२१ |

Ravindra Digambarro Aute

Digitally signed by Ravindra Digambarro Aute
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tribal Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f05a6913f9dee1f453c9a1c5a89d8c4897737ba8e4ac0edf3f2c6e69e25f4108, cn=Ravindra Digambarro Aute
Date: 2021.10.13 16:45:37 +05'30'